अखिल भारतीय सेवेतील, राज्य सेवेतील तसेच सार्वजनिक उपक्रम, मंडळे, महामंडळे इत्यादींचे पदाधिकारी यांच्या परदेश दौऱ्यासंबधीचे निकष.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:सीडीआर-२०१०/प्र.क्र.९/१०/११,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १८ मार्च, २०१०.

वाचा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:सीडीआर-१०९६/८७/ प्र.क्र.४/९६/११, दिनांक ६.४.१९९६

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:सीडीआर-१०९६/८७/ प्र.क्र.४/९६/११, दिनांक ३१.१२.१९९६

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:सीडीआर-१०९६/८७/ प्र.क्र.४/९६/११, दिनांक ११.४.१९९७

४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:सीडीआर-२००१/ प्र.क्र.१२/०१/११, दिनांक ३.११.२००१

५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:सीडीआर-१००६/ प्र.क्र.९/०६/११, दिनांक १५.६.२००६

## परिपत्रक

अखिल भारतीय सेवेतील, राज्य सेवेतील तसेच सार्वजनिक उपक्रम, मंडळे, महामंडळे इत्यादींचे पदाधिकारी यांच्या परदेश दौऱ्यांच्या संदर्भातील प्रस्ताव दिनांक १५ जून, २००६ मधील संदर्भाधीन परिपत्रकांतील सूचनांनुसार शासनाची मान्यता घेण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील छाननी समितीमार्फत सादर करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे प्राप्त होतात. त्यामधील बरेच प्रस्ताव शेवटच्या क्षणी सादर केले जातात व प्रस्तावाची छाननी करणे व सहमती मिळविणे याकरीता ते पुरेसा काळ अगोदर सादर केले जात नाहीत. यास्तव मा.मुख्यमंत्री यांचे निदेश आहेत की, परदेश दौऱ्याचे प्रस्ताव, दौरा सुरु होण्यापूर्वी किमान एक महिना अगोदर सादर होणे आवश्यक आहे. त्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत.

२. अ) परदेश दौऱ्याच्या प्रस्तावास मा.मुख्यमंत्री यांची मान्यता मिळाल्यानंतर केंद्र शासनाची मान्यता मिळविणे आवश्यक असते. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या विविध मंत्रालयाच्या तपासणीसाठी असे प्रस्ताव कमीत कमी ३ आठवडे अगोदर केंद्र शासनाकडे प्राप्त होणे आवश्यक असते. कार्यशाळा (Workshops), चर्चासत्र (Seminars), अध्ययन दौरे (Study Tour) अशा परदेश दौऱ्याचा प्रस्ताव (प्रकल्पाशी संबंधित नसलेला) प्रथम केंद्र शासनाच्या संबंधित प्रशासकीय मंत्रालयास संदर्भित होऊन, तद्नंतर परराष्ट्र व्यवहार मंत्रालयाकडे राजकीय मान्यतेसाठी संदर्भित होतात. त्यानंतरच केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या आर्थिक विभागाकडून मान्यता देण्यात येते.

ब) अ. भा. सेवेतील अधिकाऱ्यांचा परदेश दौऱ्याचा कालावधी दोन आठवडयांपेक्षा जास्त असेल, तर त्या अधिकाऱ्यांच्या केंद्र शासनातील संबंधित संवर्ग नियंत्रण प्राधिकाऱ्याची म्हणजेच भा.प्र.से.अधिकाऱ्यांकरीता डिपार्टमेंट ऑफ पर्सोनेल, भा.पो.से.अधिकाऱ्यांकरीता मिनिस्ट्री ऑफ होम अफेअर्स व भा.व.से.अधिकाऱ्यांकरीता मिनिस्ट्री ऑफ एन्व्हारमेंट अॅन्ड फॉरेस्ट यांच्या सहमतीची आवश्यकता असते.

क) केंद्र शासनातील संबंधित मंत्रालयांकडून शिफारशी प्राप्त झाल्यावर केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयातील आर्थिक व्यवहार विभागाकडून, परदेश दौऱ्यावर जाणाऱ्या सदस्यांची संख्या, भेट देण्याची ठिकाणे व वास्तव्याचा कालावधी याबाबतचे अंतिम आदेश काढले जातात आणि प्रचलित दैनिक व अन्य भत्ते देण्याबाबत आणि परदेशातील राजशिष्टाचाराबाबत सूचना संबंधित वकीलातींना देण्याकरीता परराष्ट्र मंत्रालयास विनंती करण्यात येते.

ड) परदेशी अतिथ्य (प्रवास खर्चासह) स्वीकारण्याची बाब अंतर्भूत असल्यास मिनिस्ट्री ऑफ होम अफेअर्स, फॉरेन करन्सी रेग्युलेशन अॅक्ट डिव्हीजन, राजशिष्टाचार/अतिथ्य शाखेची पूर्वसहमती आवश्यक असते.

३. केंद्र शासनाकडे अखेरच्या क्षणी प्रस्ताव पाठविल्यामुळे, अशा प्रस्तावाचा पाठपुरावा व क्षमायाचनेचे प्रसंग उद्भवतात, असे नवी दिल्ली येथील आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र शासन यांनी कळविलेले आहे.

४. परदेश दौऱ्याच्या प्रस्तावांची केंद्र शासनातील छाननीची उपरोक्त कार्यपद्धती व प्रक्रिया विचारात घेता, असे प्रस्ताव केंद्र शासनाकडे कमीत कमी ३ आठवडे अगोदर जाण्याच्या दृष्टीने असे प्रस्ताव उपरोक्त कालावधीपूर्वी विहित कार्यपद्धती अनुसरुन मा.मुख्यमंत्री यांना पुरेसा काळ अगोदर सादर होणे आवश्यक आहे. त्यामुळे **मुख्यमंत्री सचिवालयास असे प्रस्ताव** छाननी समितीमार्फत विदेश दौऱ्याच्या दिनांकाच्या **किमान एक महिना अगोदर सादर होणे आवश्यक राहिल.**

५. उपरोक्त बाबी विचारात घेऊन यापुढे सर्व प्रशासनिक विभागांनी परदेश दौऱ्याचे प्रस्ताव मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील छाननी समितीची बैठक प्रस्तावित करण्यासाठी, पुरेसा कालावधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने विदेश दौऱ्याच्या (तारखेच्या) **किमान सहा आठवडे आधी सामान्य प्रशासन विभागाकडे प्रस्ताव सादर करावेत.**

६. परदेश दौऱ्याचे प्रस्ताव छाननी समितीसमोर सादर करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविताना ते **राज्य व केंद्र शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या निकषात बसत आहेत याची विभागाने काटेकोर तपासणी करुन तसे प्रस्तावात स्पष्टपणे नमूद करावे.** विहित कालावधी आधी प्राप्त न झालेले व निकषांची पूर्तता होत नसलेले प्रस्ताव छाननी समितीसमोर सादर न करता सामान्य प्रशासन विभागाच्याच पातळीवर नाकारुन परत करण्यात येतील. **वरील सूचनांची अंमलबजावणी होईल याची दक्षता संबंधित विभागाचे सचिवांनी घ्यावी. या संबंधात प्रस्तावनेतील क्र. ५ येथील दि. १५.६.२००६ चे परिपत्रकातील सूचनांची काटेकोरपणे अंमजबजावणी विभागीय सचिवांनी करावी. सदर परिपत्रकातील परि. ७ कडे विशेषत्वाने लक्ष वेधण्यात येत असून याबाबतचे शासन सूचनांकडे दुर्लक्ष करुन विदेश दौऱ्याची प्रकरणे सादर केल्याचे आढळल्यास, खात्याचे सचिवांना जबाबदार धरण्यात येईल व ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.**

७. परदेश दौऱ्यांच्या प्रस्तावांच्या छाननीसाठीची समिती खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | - अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव (वित्त) | - सदस्य |
| ३. | प्रधान सचिव (सेवा) | - सदस्य सचिव |

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१९१८०८५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( जे. पी. डांगे )**
**मुख्य सचिव**

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती,
* पत्राने

--x--